**श्रीमती तारामती संतोष ताजी,**
**परिविक्षाधीन सहायक सचिव (तांत्रिक),**
**महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ यांना**
**सेवेतून कमी करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन आदेश क्र. सेवास-२०२२/(प्र.क्र.१०२/२२)/तांशि-१**
मंत्रालय (विस्तार), मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरू चौक,
मुंबई ४०० ०३२
दिनांक : १९ मे, २०२३

**<u>संदर्भ:</u>** १. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. परिवी-२७१५/प्र.क्र.३०२/आठ, दिनांक २९ फेब्रुवारी, २०१६
२. विभागाचे शासन आदेश क्र. ससेनि-२०२०/प्र.क्र.(९८/२०)/तांशि-१, दिनांक ०७ जानेवारी, २०२१
३. सचिव, महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ यांचे पत्र क्र. मरातंशिमं/का. २०/२०२२/९२, दिनांक ०७ डिसेंबर, २०२२
४. संचालक, तंत्र शिक्षण संचालनालयाचे पत्र क्र. ४/आस्था/सेवासमाप्त/श्रीम.ताजी/ २०२२/८८१, दिनांक १४ डिसेंबर, २०२२

**<u>प्रस्तावना:</u>**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या शिफारशीनुसार संदर्भ क्र. २ येथील आदेशान्वये श्रीमती ताजी तारामती संतोष (पूर्वाश्रमीच्या परदेशी तारामती विठ्ठलसिंग) यांची “सहायक सचिव (तांत्रिक), महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ, मुंबई” या पदावर २ वर्षांच्या परिविक्षाधीन कालावधीसाठी तात्पुरत्या स्वरूपात नियुक्ती करण्यात आली होती. त्यानुसार, श्रीमती ताजी सदर पदावर दिनांक १४ जानेवारी, २०२१ रोजी रूजू झाल्या आहेत.

श्रीमती ताजी सदर पदावर कार्यरत असताना वरिष्ठांच्या आदेशांचे पालन न करणे, त्यांच्या पदाच्या कर्तव्यांबाबत अनास्था व निष्काळजीपणा, कार्यालयातील सहकारी व वरिष्ठांसोबत उद्धट वर्तणूक, कामकाजामध्ये केलेल्या चुकांबद्दल वरिष्ठांना व पर्यायाने कार्यालयास जबाबदार ठरविणे, वरिष्ठांवर दबाव आणणे असे गंभीर प्रकारचे गैरवर्तन आढळून आले आहे. यासंदर्भात सचिव, महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ यांनी श्रीमती ताजी यांना वेळोवेळी ज्ञापन बजावून वर्तणूक व कामाचा दर्जा सुधारण्याबाबत सूचित केले. तथापि, अनेक वेळा सुधारणेची संधी देऊनही श्रीमती ताजी यांच्या कामाचा दर्जा व वर्तणूक यामध्ये सुधारणा झाली नाही. सबब, श्रीमती ताजी यांच्या परिविक्षाधीन कालावधीतील कामकाज व वर्तणूक “असमाधानकारक” असल्याने त्यांना शासन सेवेतून कमी करण्यासंदर्भात शासनास प्रस्ताव सादर करण्याची विनंती सचिव, महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ यांनी संदर्भ क्र. ३ येथील पत्रान्वये संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय यांना केली आहे.

त्यानुसार, श्रीमती ताजी यांच्या परिविक्षाधीन कालावधीतील कामाचा दर्जा व वर्तणूक असमाधानकारक असल्याने त्यांना शासन सेवेतून कमी करण्याबाबत संचालक, तंत्र शिक्षण यांनी संदर्भ क्र. ४ येथील पत्रान्वये शासनास प्रस्ताव सादर केला आहे. त्यानुसार, सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयातील तरतुदी तसेच, संदर्भ क्र. २ येथील नियुक्ती आदेशातील अटी व शर्तीनुसार, श्रीमती तारामती ताजी, परिविक्षाधीन सहायक सचिव (तांत्रिक) यांच्या परिविक्षाधीन कालावधीतील कामाचा दर्जा व वर्तणूक “असमाधानकारक” असल्याने त्यांना शासन सेवेतून कमी करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन आदेश:**

श्रीमती ताजी तारामती संतोष (पूर्वाश्रमीच्या परदेशी तारामती विठ्ठलसिंग) यांची संदर्भ क्र. २ येथील आदेशान्वये "परिविक्षाधीन सहायक सचिव (तांत्रिक), महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ, मुंबई" या पदावर नियुक्ती करण्यात आली होती. श्रीमती ताजी सदर पदावर कार्यरत असताना परिविक्षाधीन कालावधीतील कामाचा दर्जा व वर्तणूक "असमाधानकारक" आढळून आल्याने श्रीमती ताजी यांना या आदेशाच्या दिनांकापासून शासन सेवेतून कमी करण्यात येत आहे.

२. प्रस्तुत आदेश सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

३. संचालक, महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ यांनी पुढील आवश्यक कार्यवाही तातडीने करावी.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२३०५१९१५०७१५४३०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PAGARE SHRIKRISHNA KASHINATH

Digitally signed by PAGARE SHRIKRISHNA KASHINATH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=cc78d6dbb4fe0c3d5473ed374dc1007ae7db08a8a6ca9468ce2a8aae16c0cb06, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=4E8BC157609C105D396B04018FA47F8909333AFC18DDC3893CC043F18F759C0B, cn=PAGARE SHRIKRISHNA KASHINATH
Date: 2023.05.19 15:07:39 +05'30'

**( श्रीकृष्ण पगारे )**
कार्यासन अधिकारी

**प्रति,**

श्रीमती तारामती संतोष ताजी, परिविक्षाधीन सहायक सचिव (तांत्रिक), महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ, मुंबई

**प्रत:**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा. मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र १/ २, मुंबई / नागपूर
४. संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
५. संचालक, महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ, मुंबई
६. सर्व विभागीय सहसंचालक, तंत्र शिक्षण (संचालनालयामार्फत)
७. सर्व विभागीय कार्यालये, महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ (तंत्र शिक्षण मंडळामार्फत)
८. प्राचार्य / संचालक, सर्व शासकीय अभियांत्रिकी / औषधनिर्माणशास्त्र महाविद्यालये
९. प्राचार्य, सर्व शासकीय तंत्रनिकेतने
१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
११. प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
१२. निवड नस्ती, तां.शि.१.